**बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ च्या कलम ५४ नुसार संस्थांच्या तपासणीसाठी राज्य स्तरीय तपासणी समितीच्या रचनेत बदल करण्याबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

**महिला व बाल विकास विभाग,**

**शासन निर्णय क्र. बालगृ-२०१७/प्र.क्र.२११/का-८,**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२०

संदर्भ :- १. महिला व बाल विकास विभागाचा समक्रमांकीत शासन निर्णय दिनांक २१ मार्च, २०१८
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे अ.शा. पत्र दि. ३ ऑक्टोबर, २०१९

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाचा बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ हा जानेवारी २०१६ पासून देशभरात लागू करण्यात आला आहे. या अधिनियमाच्या कलम ५४ नुसार अधिनियमांतर्गत नोंदणीकृत तसेच मान्यता प्राप्त संस्थांच्या तपासणीसाठी राज्य व जिल्हा स्तरावर तपासणी समिती गठित करण्याबाबत तरतूद आहे. त्यानुसार तसेच महाराष्ट्र राज्य बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) नियम, २०१८ मधील नियम ४३ मधील तरतूदीनुसार संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णय दि. २१ मार्च, २०१८अन्वये राज्य व जिल्हा स्तरावर तपासणी समितीचे गठिण करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयान्वये गठित राज्य स्तरीय तपासणी समितीच्या कामकाजामध्ये काही अडचणी येत असल्याने सदर समितीच्या बदल करण्याची विनंती आयुक्त, महिला व बाल विकास यांच्या दि.३ ऑक्टोबर, २०१९ रोजीच्या अर्धशासकीय पत्रान्वये केली आहे. त्यास अनुसरुन राज्य स्तरीय तपासणी समितीच्या रचनेमध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ च्या अनुषंगाने “विधी संघर्षग्रस्त बालके” आणि “काळजी व संरक्षणाची गरज असलेली बालके” यांच्यासाठी कलम २(२१) मध्ये नमूद व्याख्येनुसार बालकांना निवासी सेवा पुरविणाऱ्या शासकीय तसेच स्वयंसेवी संस्थांची वेळोवेळी तपासणी करण्यासाठी वाचा क्र. १ वरील शासन निर्णयान्वये गठित राज्यस्तरीय तपासणी समितीच्या रचनेमध्ये पुढीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे.

**राज्य तपासणी समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १. | सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी तथा आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय | अध्यक्ष |
| २. | तपासणी समितीच्या अध्यक्षाने नियुक्त केल्याप्रमाणे मंडळातील किंवा समितीतील प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | राज्य बाल हक्क संरक्षण आयोगाचा प्रतिनिधी | सदस्य |
| ४. | राज्य दत्तक ग्रहण स्त्रोत संस्था (SARA), कार्यक्रम व्यवस्थापक | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५. | आरोग्य विभागाने शिफारस केलेल्या वैद्यकीय तज्ञ | सदस्य |
| ६. | तपासणी समितीच्या अध्यक्षाने नियुक्त केल्याप्रमाणे बाल संरक्षण तज्ञ | सदस्य |
| ७. | तपासणी समितीच्या अध्यक्षाने नियुक्त केलेला स्वयंसेवी संघटनेचा प्रतिनिधी | सदस्य |
| ८. | तपासणी समितीच्या अध्यक्षाने नियुक्त केलेला नामांकित समाजिक कार्यकर्ता | सदस्य |
| ९. | विभागीय आयुक्त (महसूल) यांनी नामनिर्देशित केलेला महसूल विभागाचा प्रतिनिधी | सदस्य |
| १० | विभागीय आयुक्त (महसूल) यांनी नामनिर्देशित केलेला पोलीस विभागाचा प्रतिनिधी/जिल्हा स्तरावरील अधिकारी | सदस्य |
| ११. | विभागीय आयुक्त (महसूल) यांनी नामनिर्देशित केलेला आरोग्य विभागाचा प्रतिनिधी/जिल्हा वैद्यकीय अधिकारी | सदस्य |
| १२ | विभागीय स्तरावर विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास | संबंधित विभागासाठी विभागीय स्तरावरील समन्वयक |
| १३ | उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे | सदस्य सचिव |

२. उपरोक्त प्रमाणे गठित होणाऱ्या राज्य स्तरीय तपासणी समितीच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या तसेच इतर अटी व शर्ती या संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णय दि. २१ मार्च, २०१८अन्वये नमूद केल्याप्रमाणेच कायम राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२१२१७१९५२१३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2020.02.12 17:26:00 +05'30'

**(स्मिता निवतकर)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
७. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१०. सर्व उपसचिव, सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१२. कार्यक्रम व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी, पुणे.
१३. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
१४. सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती, का-०८.